**महाराष्ट्र शासन**
ग्राम विकास व जलसंधारण विभाग,
**शासन निर्णय क्र.नापामि २००९/प्र.क्र.८८/जल-७,**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
**दिनांक :- ३० ऑक्टोबर, २००९.**

**वाचा :- शासन निर्णय ग्राम विकास व जलसंधारण विभाग**
**१) क्र.आदर्श २००७/प्र.क्र.१२१/जल-७, दि.३० नोव्हेंबर, २००७.**
**२) क्र.जलसं २००८/प्र.क्र.५६/जल-७, दि.११ एप्रिल, २००८ व दि.१७ एप्रिल, २००८.**
**३) क्र.जलसं २००८/प्र.क्र.१५९/जल-७, दि.२७ ऑक्टोबर, २००८.**
**४) क्र.कोपामि २००९/प्र.क्र.७९/जल-७, दि.६ ऑगस्ट, २००९.**
**५) नियोजन विभाग शासन निर्णय क्र.नाविका २००९/प्र.क्र.१२/का.१४२०, दि.२७ ऑगस्ट, २००९.**

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र राज्यातील पडीक / अवनत जमिनीचा विकास करण्यासाठी शासनाने पाणलोट विकास कार्यक्रमावर भर दिलेला आहे. त्यानुसार एकात्मिक पाणलोट विकास कार्यक्रमाची सुरुवात करण्यात आली आहे. प्रामुख्याने मृद व जलसंधारणाची कामे रोजगार हमी योजनेमार्फत केली जात होती. तथापि, भूगर्भातील पाण्याच्या पातळीत फारशी वाढ झाल्याचे दिसून येत नाही. याचे कारण की हाती घेतलेली पाणलोटाची बरीचशी कामे अजूनही अपूर्ण आहेत. तसेच ही कामे प्रकल्पाधारित तत्वावर झालेली नसल्याने अपेक्षित उद्दिष्ट (Out Come) साध्य झालेले नाही किंवा त्याचे दृश्य परिणाम दिसून आलेले नाहीत. हे लक्षात घेऊन सन २००६-०७ पासून शास्त्रीय पध्दतीने पाणलोट विकासाचा कार्यक्रम प्रकल्पाधारित राबविण्याचा शासनाने निर्णय घेतला. मराठवाडा व विदर्भ विभागातील विशिष्ट भौगोलिक परिस्थिती विचारात घेवून भूगर्भातील पाण्याची पातळी वाढविण्याच्या दृष्टीने सन २००६-०७ पासून मराठवाडा विभागासाठी मराठवाडा पाणलोट विकास मिशन व विदर्भ विभागासाठी विदर्भ पाणलोट विकास मिशनची स्थापना करण्यात आलेली आहे. तसेच संदर्भाधीन दि.६ ऑगस्ट, २००९ च्या शासन निर्णयान्वये कोकण विभागासाठी कोकण पाणलोट मिशन स्थापन करण्यात आले आहे. याच धर्तीवर नाशिक महसूल विभागासाठी स्वतंत्र पाणलोट विकास मिशन स्थापन करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

नाशिक महसूल विभागातील नाशिक, धुळे, नंदुरबार, जळगांव व अहमदनगर या पाच जिल्ह्यात **नाशिक महसूल विभाग पाणलोट मिशन** खालीलप्रमाणे कार्यान्वित करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

(१) नाशिक महसूल विभागातील नाशिक, धुळे, नंदुरबार, जळगांव व अहमदनगर या पाच जिल्ह्यात प्रत्येकी दोन याप्रमाणे GSDA द्वारा घोषित एकूण १० मेगा पाणलोटांचा विकास करणे. त्यामध्ये सलग समपातळी चर, वनीकरण, कम्पार्टमेन्ट बंडींग, लहान मातीबांध, गॅबियन बंधारे, शेततळी, वळण बंधारे, लूज बोल्डर स्ट्रक्चर, माती नालाबांध, सिमेंट नालाबांध, व्दाळीचे बांध इ. कामे प्रामुख्याने घेण्यात येतील.

(२) या प्रकल्पांतर्गत मेगा पाणलोटांची निवड GSDA व MRSAC यांनी घोषित केलेल्या पाणलोटांपैकी प्रथम High Priority+DPAP त्यानंतर High Priority, Moderate Priority +DPAP इ. नुसार करण्यात येईल.

(३) निवडलेल्या प्रत्येक मेगा पाणलोटात असलेल्या सर्व वनक्षेत्राचा समावेश प्रकल्प अहवालात करण्यात येईल. वनक्षेत्रात अपेक्षित असलेली कामे वन विभागामार्फत करण्यात येतील किंवा सदर विभागाच्या मान्यतेने अन्य क्षेत्रिय यंत्रणेकडून करण्यात येतील.

(४) या कार्यक्रमाची अंमलबजावणी सन २००९-१० पासून पुढील ३-४ वर्षात करण्यात येईल.

(५) या कार्यक्रमांतर्गत पाणलोट प्रकल्पाची अंदाजित किंमत रु.२००.०० कोटी इतकी राहील. ही योजना आरआयडीएफ अंतर्गत नाबार्डमार्फत उपलब्ध निधीतून राबविण्यात येईल.

२. आयुक्त (कृषि) पुणे यांनी उपरोक्त परिच्छेदात नमूद केलेल्या निकषानुसार नाशिक महसूल विभागातील नाशिक, धुळे, नंदुरबार, जळगांव व अहमदनगर या ५ जिल्ह्यांतील पाणलोटांची निवड करुन प्रकल्पनिहाय प्रस्ताव शासन निर्णय दि.३० नोव्हेंबर, २००७ अन्वये उपाध्यक्ष, महाराष्ट्र राज्य जलसंधारण सल्लागार परिषद यांच्या अध्यक्षतेखाली गठीत केलेल्या सुकाणू समितीच्या मान्यतेने एक महिन्याच्या कालावधीत शासनास पाठवावा आणि त्याची आगाऊ प्रत नाबार्डकडे मान्यतेसाठी पाठवावी.

३. विभागीय तसेच जिल्हास्तरावरील पाणलोट विकास मिशन, ग्राम विकास समिती व पाणलोट विकास पथक, लोकसहभाग व कामामध्ये पारदर्शकता ठेवणे तसेच प्रशिक्षण, सामुहिक संगठन, संनियंत्रण, मूल्यमापन इ. बाबी नाबार्डच्या मार्गदर्शक सूचनांप्रमाणे राहतील.

४. उपरोक्त कार्यवाही पूर्ण करणे तसेच निवडलेले पाणलोट सन २००९-१० या वर्षापासून कार्यान्वित करणे याकरीता आवश्यक त्या मार्गदर्शक सूचना आयुक्त (कृषि) पुणे यांनी संबंधित क्षेत्रिय अधिका-यांना तातडीने निर्गमित कराव्यात.

५. पाणलोट मिशनचे प्रमुख उद्दिष्ट नैसर्गिक साधनसंपत्तीचा विकास करण्याबरोबर लोकांचा आर्थिक स्तर उंचावण्यासाठी स्वयंरोजगाराच्या संधी निर्माण करणे असल्यामुळे पाणलोटाचा कालावधी पूर्ण झाल्यानंतर त्या क्षेत्रामध्ये किमान एक वर्षानंतर पाणलोट प्लसचे काम सुरु करण्यात येईल.

६. हा शासन निर्णय नियोजन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.५४६/१४३३, दि.२०.८.२००९ व वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.२३२/०९/व्यय-१५, दि.५.१०.२००९ अन्वये मिळालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

७. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध असून त्याचा संगणक संकेतांक २००९१०३०१८४९३५००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( रेखा भिडे )
सह सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति,
मा. राज्यपाल यांचे खाजगी सचिव,
मा.मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
मा.उपमुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
मा.मंत्री (जलसंधारण) यांचे खाजगी सचिव,
मा.राज्यमंत्री (जलसंधारण) यांचे खाजगी सचिव,
सर्व मा.मंत्री, मा.राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
मा.उपाध्यक्ष, महाराष्ट्र राज्य जलसंधारण सल्लागार परिषद,
मुख्य सचिव यांचे सचिव,
सर्व अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव, मंत्रालय,
सर्व विभागीय आयुक्त,
आयुक्त (कृषि), महाराष्ट्र राज्य, पुणे,
संचालक,मृदसंधारण व पाणलोट क्षेत्र व्यवस्थापन,महाराष्ट्र राज्य,पुणे,
मुख्य अभियंता, लघु पाटबंधारे (स्थानिक स्तर),पुणे,
प्रधान मुख्य वन संरक्षक, नागपूर, महाराष्ट्र राज्य, नागपूर,
संचालक, सामाजिक वनीकरण, महाराष्ट्र राज्य, पुणे,
संचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, पुणे,
सर्व जिल्हाधिकारी,
सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद,
संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई,
महासंचालक, माहिती व जनसंपर्क, मुंबई (प्रसिध्दी करीता),
सर्व विभागीय कृषि सहसंचालक,
सर्व अधीक्षक अभियंता, लघु पाटबंधारे (स्थानिक स्तर),
सर्व सहसंचालक, सामाजिक वनीकरण वृत्ते,
सर्व जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी,
सर्व उपसंचालक, सामाजिक वनीकरण वृत्ते,
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
महालेखापाल, (लेखापरिक्षा), महाराष्ट्र १ व २, मुंबई व नागपूर,
महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १ व २, मुंबई व नागपूर,
महाराष्ट्र राज्य जलसंधारण सल्लागार परिषदेचे सर्व अशासकीय सदस्य,
सर्व मंत्रालयीन विभाग,
सर्व सहसचिव/उपसचिव/अवर सचिव/ कार्यासन अधिकारी (जलसंधारण प्रभाग) ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई,
निवडनस्ती जल-७.